कॉन्स्तन्तिन पाउस्तोव्स्की

# विसकटलेला चिमणा

अनुवाद : अनिल हवालदार
सजावट : वालेरी पेरेबेरीन

रादुगा प्रकाशन
मॉस्को

भिंतीवरच्या जुन्या घड्याळातील खेळण्यामधील सैनिकाच्या आकाराच्या लोखंडी लोहाराने हातोडा वर उचलला. घड्याळ टिकटिकले आणि लोहाराने जड हातोडा छोट्या तांब्याच्या ऐरणीवर आदळला. जलद टोलाचा प्रतिध्वनी खोलीत घुमला, पुस्तकांच्या कपाटाखाली घरंगळत गेला व विरून नाहीसा झाला.

लोहाराने ऐरणीवर आठ वेळा प्रहार केले. नववा प्रहार करण्याचीही त्याची इच्छा होती, पण त्याच्या हाताला झटका बसला व हात हवेतच अधांतरी थांबला. तशा उगारलेल्या हाताने तो आख्खा तासभर उभा राहिला. नऊ वेळा ऐरणीवर प्रहार करायची वेळ भरेपर्यंत.

मारीया खिडकीशी उभी होती. पण तिने मागे वळून पाहिले नाही. ती जर वळली असती तर तिच्या चाहुलीने पेत्रोवना दाई नक्की जागी झाली असती आणि मारीयाला तिने झोपायला पिटाळले असते.

पेत्रोवना दिवाणावर डुलकी घेत होती आणि आई नेहमीप्रमाणे थिएटरला गेली होती. ती थिएटरमध्ये नर्तिका होती, पण मारीयाला मात्र कधीही बरोबर घेऊन जात नसे.

थिएटर प्रचंड मोठे होते. त्याला दगडी गोल खांब होते. त्याच्या छपरावर मागील पायांवर उभे झालेले ब्राँझचे घोडे होते. डोक्यावर पुष्पचक्र धारण केलेल्या माणसाने त्या घोड्यांचे लगाम खेचून धरले होते. तो माणूस खूप ताकदवान आणि धीट असावा. छपराच्या अगदी टोकाशी त्या बेफाम घोड्यांना थांबवण्यात त्याला यश आले होते. घोड्यांचे पुढचे पाय चौकावर अधांतरी होते. त्या माणसाने जर ब्राँझच्या घोड्यांना आवरून धरले नसते तर केवढा अनर्थ माजला असता, ह्याची मारीया मनातल्या मनात कल्पना करायची. ते घोडे छपरावरून खाली चौकात खण-

खणाट आणि दणदणाट करत पोलीसांपाशी कोसळले असते.

गेले काही दिवस आई फार बेचैन होती. हेमाराणीच्या भूमिकेची ती तयारी करत होती आणि बॅलेच्या पहिल्याच प्रयोगाला मारीयाला व पेत्रोवनाला नेण्याचे तिने कबूल केले होते.

पहिल्या प्रयोगाला दोन दिवस उरले होते तेव्हा आईने पेटीमधून पातळ काचेचा बनवलेला छोटा फुलगुच्छ बाहेर काढला. मारीयाच्या वडिलांनी आईला तो भेट दिला होता. मारीयाचे वडील खलाशी होते आणि कुठल्यातरी दूरच्या देशाहून त्यांनी तो छोटा फुलगुच्छ आणला होता.

नंतर मारीयाचे वडील युद्धावर गेले होते, त्यांनी फॅसिस्टांची अनेक जहाजे बुडवली, दोनदा त्यांची स्वतःची, जहाजे बुडाली होती, ते जखमी झाले होते, पण जिवंत राहिले होते. आता ते परत दूर, "कामचात्का" अशा विचित्र नांवाच्या ठिकाणी गेले होते, लौकर परत येणार नव्हते, केवळ वसंताच्या मोसमात घरी येणार होते.

आईने काचेचा फुलगुच्छ हाती घेतला आणि हलक्या आवाजात काही शब्द ती त्याला उद्देशून बोलली. हे आश्चर्यकारक होते, कारण यापूर्वी आई वस्तूंशी कधीही बोलली नव्हती.

"पाहिलंस?" आई कुजबुजली, "तुला फार वाट पहावी लागणार नाही."

"कशाची वाट पाहणार?" मारीयाने विचारले.

"तू लहान आहेस. अजून तुला काही समजत नाही," आई उत्तरली. "तुझ्या वडलांनी हा गुच्छ मला भेट दिला होता आणि सांगितलं होतं – 'हेमाराणीच्या भूमिकेत जेव्हा तू पहिल्यांदा नाचशील, तेव्हा राजवाड्यातल्या नृत्याच्या प्रसंगानंतर न विसरता तुझ्या पोषाखाला हा गुच्छ टोचून लाव. तेव्हा मला समजेल की, ह्यावेळी तू माझी आठवण केली होतीस."

"मला समजलं सगळं," चिडलेली मारीया म्हणाली.

"काय समजलं तुला?"

"सगळं!" मारीया उत्तरली आणि तिचा चेहरा लाल झाला. तिच्यावर कुणी अविश्वास दाखवलेला तिला आवडत नसे.

आईने काचेचा गुच्छ स्वत:च्या टेबलावर ठेवला आणि मारीयाला दटावले की, साधा करंगळीचासुद्धा स्पर्श त्या गुच्छाला करायचा नाही, कारण तो खूप नाजुक होता.

ह्या संध्याकाळी गुच्छ मारीग्राच्या पाठीशी टेबलावर पडला होता आणि चमकत होता. शांतता एवढी विलक्षण होती की, भोवताली सर्व झोपल्याचे भासत होते: सगळं घर, खिडक्यांखालची बाग, फाटकापाशी खाली बसलेला व हिमवर्षावामुळे जास्त जास्त पांढरा बनत चाललेला सिंह. झोपले नव्हते फक्त मारीया, घर उबदार ठेवणारा रेडिएटर आणि हिवाळा. मारीया खिडकीतून बाहेर पहात होती, रेडिएटर आपले उबदार गाणे हळू आवाजात गुणगुणत होता आणि हिवाळा आकाशातून संथपणे सतत हिमवर्षाव करत होता. हिमकण रस्त्यावरच्या दिव्याजवळून उडत जात होते आणि जमिनीवर त्यांचे थर बसत होते. एवढ्या काळ्याकुट्ट आकाशामधून असे पांढरेशुभ्र हिमकण कसे कोसळत होते हे मात्र समजत नव्हते. आणखीसुद्धा समजत नव्हते का, ऐन हिवाळ्याच्या आणि गोठलेल्या थंडीच्या दिवसात, आईच्या टेबलाजवळच्या करंडीत तांबडी मोठ्ठी फुले कशी उमलली होती. त्यापेक्षाही समजत नव्हता पांढरा कावळा. खिडकीसमोरच्या झाडाच्या फांदीवर तो बसला होता आणि अजिबात डाळा न लवबता मारीयाकडे टक लावून पाहात होता.

पेत्रोवना खिडकीमधील वरची छोटी चौकट केव्हा उघडेल त्याची कावळा वाट पहात होता. खोलीत ताजी हवा खेळवण्यासाठी पेत्रोवना छोटी खिडकी उघडायची आणि मारीयाचे तोंड धुवायला, दात घासायला तिला घेऊन जायची.

पेत्रोवना आणि मारीया खोलीतून गेल्या रे गेल्या की कावळा छोट्या खिडकीतून आत यायचा, नजरेला प्रथम दिसेल ती वस्तू चोचीत पकडायचा आणि फडफडत वेगाने पसार व्हायचा.

घाईगडबडीत स्वत:चे पंजे गालीचावर पुसायला तो विसरायचा आणि टेबलावर ओले ठसे मागे ठेवून जायचा.

दरवेळी खोलीत परतल्यानंतर पेत्रोवना हात उडवून ओरडायची:

"डांबरट! परत काहीतरी चोरून नेलंस!"

मारीयासुद्धा हात उडवायची आणि ह्यावेळी कावळ्याने काय पळवून नेले ह्याचा शोध घेण्यासाठी पेत्रोवनाबरोबर खोलीभर धावाधाव करायची. बहुतेक वेळा साखर, बिस्कीट अथवा सॉसेज असे खाण्याचे पदार्थ कावळा लंपास करायचा.

हिवाळ्यात कावळा एका स्टॉलमध्ये रहायचा. उन्हाळ्यात ह्या स्टॉलमध्ये आइस्क्रीम विकत असत. कावळा महाधूर्त आणि कंजूस होता. चोरलेल्या सर्व वस्तूंचा खजिना त्याने स्टॉलच्या फटींमधून लपवला होता. चिमण्यांनी चोरू नये म्हणून!

कधी कधी कावळ्याला स्वप्न पडायचे की, चिमण्यांनी स्टॉल-मध्ये घूसखोरी केली आहे आणि गोठलेले सॉसेजचे तुकडे, सफरचं-दाच्या साली व टॉफीचे चांदीचे कागद त्या पळवत आहेत. अशा वेळी कावळा झोपेतच चिडून काव काव ओरडायचा व कोपऱ्या-वरचा पोलीस त्यामुळे दचकून आजूबाजूला पहात कानोसा घेऊ लागायचा. स्टॉलमधून येणारी काव काव त्याने आजपर्यंत अनेक-वेळा ऐकली होती व त्याला आश्चर्य वाटत होते. खूपदा तो स्टॉलपाशी आला होता आणि रस्त्यावरच्या दिव्याचा प्रकाश टाळण्यासाठी डोळ्यांवर हातांचा आडोसा धरून त्याने स्टॉलमध्ये डोकावून पाहिले होते. पण स्टॉलमध्ये अंधार होता आणि फक्त तळाशी मोडलेले खोके पडलेले दिसायचे.

एकदा कावळ्याची स्टॉलमध्ये एका छोटया, विसकटलेल्या चिमण्याशी गाठ पडली. त्या चिमण्याचे नांव होते पाश्का.

चिमण्यांचे आयुष्य मोठे कठीण बनले होते. ओट धान्य मिळेनासे झाले होते, कारण शहरात आता घोडे जवळजवळ शिल्लक राहिले नव्हते. पाश्काचे आजोबा कधी कधी जुन्या आठवणी सांगायचे. म्हाताऱ्या चिमण्याचे नांव होते "चिचकिन." ते म्हणत की, पूर्वीच्या काळी चिमण्यांचे कळप नेहमी घोडागाडयांच्या तळापाशी सबंध दिवसभर भिरभिरत असायचे, कारण तेथे घोडयांच्या तोबऱ्यांच्या पिशव्यांमधून भरपूर ओट जमिनीवर सांडलेले असायचे.

आता शहरात मोटारींचा सुळसुळाट झाला होता. त्यांना ओट खायला घालत नाहीत, सुस्वभावी घोडयांप्रमाणे त्या ओट मजेने चघळत नाहीत. घाणेरडा वास येणारे कसलेतरी विषारी पाणी पितात. चिमण्यांची संख्या रोडावली. काही चिमण्या

खेड्यांमध्ये घोड्यांपाशी रहायला गेल्या, तर काही चिमण्या समुद्रकिनाऱ्यानजीकच्या बंदरगावांना गेल्या. बंदरगावांना बोटींमधून धान्याची चढ-उतार होते व त्यामुळे तेथे चिमण्यांची चंगळ चालते.

"पूर्वीच्या काळी," चिचकिन सांगायचा, "चिमण्यांच्या कळपात दोन-तीन हजार चिमण्या असायच्या. हवा कापत हा कळप जेव्हा उडू लागायचा तेव्हा केवळ माणसेच नव्हे, तर घोडागाड्यांचे घोडेसुद्धा मागच्या पायांवर घाबरून उभे रहायचे आणि खिंकाळायचे: 'देवा रे, वाचव! ह्या चिमण्यांचा काही बंदोबस्त करता येणार नाही का?'

"आणि बाजारांमध्ये चिमण्यांच्या काय जोरदार मारामाऱ्या व्हायच्या! पिसांचे ढग उडायचे. आता तशा झुंजी घडणं शक्य नाही..."

पाश्काने स्टॉलमध्ये प्रवेश केला आणि तेथे कसल्याही वस्तूवर चोच मारायची संधी मिळण्यापूर्वीच कावळ्याने त्याच्यावर चाल केली व मस्तकावर प्रहार केला.

पाश्का खाली पडला, त्याने डोळे मिटले आणि मेल्याचे सोंग केले.

कावळ्याने त्याला स्टॉलबाहेर फेकले आणि जगातल्या सगळ्या चिमण्यांच्या चोर जमातीला उद्देशून शिव्या घालत तो रागाने कावकावला.

पोलीसाने सभोवार पाहिले आणि तो स्टॉलपाशी आला. पाश्का बर्फावर पडला होता. वेदनेने त्याच्या मस्तकाच्या ठिकऱ्या उडत होत्या. त्याने हळूच चोचीची उघडझाप केली.

"हात् तुझी बेघर भटक्या!" पोलीस म्हणाला. त्याने हातमोजा काढला, त्यात पाश्काला गुंडाळले व स्वतःच्या खिशात ठेवले. चिमण्या, तुझं आयुष्य फार कठीण दिसतंय!"

पाश्का पोलीसाच्या खिशात पडून डोळ्यांची उघडझाप करत होता. अपमान आणि भुकेपायी रडत होता. अन्नाचे काही कण खायला मिळाले तर किती बरे होईल! पण पोलीसाच्या खिशात पावाचे कण सापडले नाही. तेथे फक्त निरुपयोगी तंबाखूचे कण होते.

सकाळी पेत्रोवना आणि मारीया बागेत फिरायला गेल्या. पोलीसाने मारीयाला जवळ बोलावले आणि कडक आवाजात विचारले:

"तुम्हाला एखादा चिमणा हवा आहे का? घरात पाळायला?"

मारीयाने त्याला उत्तर दिले की, चिमणा पाळायची तिची खूप खूप इच्छा होती. पोलीसाच्या लाल, बारा-पाऊस खाल्लेल्या चेहऱ्यावर एकदम चुण्या पडल्या. तो हसला आणि पाश्का-सकटचा हातमोजा त्याने खिशातून बाहेर काढला.

"घ्या! हातमोजासकट. नाहीतर तो गारठून जाईल. हातमोजा मला नंतर आणून द्या. माझी कामाची पाळी बारा वाजेपर्यंत आहे."

मारीयाने पाश्काला घरी आणले, त्याची पिसे ब्रशाने सरळ केली, त्याला खाऊ घातले आणि मोकळे सोडले. पाश्का बशीच्या कडेवर बसला, बशीतला चहा प्यायला, नंतर लोहाराच्या डोक्यावर जाऊन बसला. तेथे त्याला डुलकी लागणार होती. पण लोहाराला संताप आला. त्याने आपला हातोडा उगारला आणि पाश्कावर प्रहार करण्याची त्याची इच्छा होती. पाश्का फडफड आवाज करत दुसऱ्या ब्राँझच्या डोक्यावर जाऊन बसला. विख्यात परीकथालेखक इवान क्रीलोव यांचा तो अर्धपुतळा होता. क्रीलोव यांच्या गुळगुळीत डोक्यावर तोल सावरून बसणे पाश्काला खूप अवघड गेले. संतापलेल्या लोहाराने ऐरणीवर हातोड्याचे प्रहार करायला आरंभ केला – त्याने अकरा वेळा प्रहार केले.

मारीयाच्या खोलीत पाश्का सबंध दिवसभर राहिला. संध्याकाळी म्हातारा कावळा छोट्या खिडकीतून कसा आत आला आणि टेबलावरील मांसाचा तुकडा त्याने कसा पळवला, हे पाश्काने पाहिले. तांबड्या फुलांच्या टोपलीमागे त्यावेळी पाश्का लपला व गुपचूप बसून राहिला.

तेव्हापासून पाश्का दररोज मारीयाला भेटायला येऊ लागला. ती त्याला खाऊ घालायची तेव्हा तिच्या उपकारांची परतफेड कशी करावी याबाबत पाश्काच्या मनात विचार यायचे. एक दिवस त्याने बागेतल्या झाडावर सापडलेला गोठलेला काटेरी सुरवंट आणून दिला. पण मारीयाने तो सुरवंट काही खाल्ला नाही आणि पेत्रोवना खूप चिडली व तिने सुरवंट खिडकीबाहेर फेकून दिला.

तेव्हा म्हाताऱ्या कावळ्यावर सूड घेण्यासाठी म्हणून पाश्काने स्टॉलमधील कावळ्याने चोरलेल्या वस्तू पळवायला आरंभ केला व त्या वस्तू तो परत मारीयाकडे आणून टाकू लागला. कधी सुकलेल्या फळाच्या रसाच्या वडीचा तुकडा, कधी केकचा तुकडा,

कधी टॉफीवरचा लाल कागद.

कावळा केवळ मारीयाच्या घरातच नव्हे, तर आणखीही काही घरांमधून चोऱ्या करत असावा, कारण पाश्का कधी कधी चुकून दुसऱ्यांच्या वस्तू मारीयाकडे आणून टाकायचा : कंगवा, पत्ता, फाऊंटनचे सोनेरी टोक.

ह्या वस्तू घेऊन पाश्का खोलीत उडत यायचा, त्या वस्तूंना फरशीवर टाकायचा, खोलीत काही घिरट्या घालायचा व छोट्या झुपकेदार तोफगोळ्याप्रमाणे खिडकीमधून तीरासारखा नाहीसा व्हायचा.

ह्या संध्याकाळी पेत्रोवना झोपली होती. कावळा छोट्या खिडकीमधून कसा आत येतो हे बघण्याची मारीयाची इच्छा होती. तिने यापूर्वी हे कधीही पाहिले नव्हते.

मारीया खुर्चीवर चढली, तिने छोटी खिडकी उघडली आणि कपाटामागे ती दडून बसली. सुरवातीला खिडकीमधून मोठमोठे हिमकण उडत आत आले आणि फरशीवर वितळले. मग अचानक खरवडण्याचा आवाज झाला. कावळा अंग चोरून खिडकीमधून आत आला, आईच्या टेबलावर उड्या मारत फिरला, त्याने आरशात पाहिले, तेथे तसाच रागीट कावळा पाहून त्याने पिसे फुलवली. मग तो कावकावला, झटकन त्याने काचेचा गुच्छ चोचीत पकडला आणि खिडकीमधून तो पसार झाला.

मारीया किंचाळली. पेत्रोवना जागी झाली. ती विव्हळू लागली आणि रागे भरू लागली. थिएटरमधून आई जेव्हा परतली, तेव्हा ती खूप वेळ रडत बसली. तिच्याबरोबर मारीयासुद्धा रडली. पेत्रोवना म्हणाली की, हताश होण्याचे कारण नव्हते, कारण जर मूर्ख कावळ्याने काचेचा गुच्छ बर्फात टाकून दिला नाही, तर तो परत मिळण्याची शक्यता होती.

सकाळी पाश्का उडत आला. विश्रांतीसाठी तो क्रीलोवाच्या ब्राँझच्या डोक्यावर बसला. गुच्छ चोरीला गेल्याची बातमी त्याने ऐकली, आपली पिसे फुलवून तो विचारात गढला.

नंतर, जेव्हा आई तालमीसाठी थिएटरला गेली, तेव्हा पाश्का तिच्या पाठोपाठ गेला.

विजेच्या एका खांबावरून दुसऱ्या खांबावर उडत, झाडांवर बसत, अखेरीस तो

थिएटरपर्यंत पोहोचला. तेथे ब्राँझच्या घोड्याच्या तोंडावर तो थोडा वेळ बसला, त्याने स्वतःची चोच स्वच्छ केली, पंजाने पापणी खाजवली, चिव चिव केली आणि तो उडून गेला.

संध्याकाळी आईने मारीयाला समारंभप्रसंगीचा शुभ्र फ्रॉक घातला. पेत्रोवनाने तपकिरी रंगाची शाल खांद्यावर टाकली आणि तिघीही एकत्र थिएटरला गेल्या. नेमक्या ह्याच वेळी, चिचकिनच्या आज्ञेनुसार पाश्काने आसपासच्या सगळ्या चिमण्यांना गोळा केले. काचेचा गुच्छ जेथे लपवून ठेवलेला होता त्या कावळ्याच्या स्टॉलवर हल्ला चढवण्याचा चिमण्यांचा बेत होता.

अर्थातच चिमण्यांनी एकदम स्टॉलवर झडप घातली नाही. आसपासच्या झाडांवर आणि घरांच्या छपरावर बसून तास-दोन तासपर्यंत त्यांनी कावळ्याला टोमणे मारून खूप चिडवले. तो संतापेल आणि स्टॉलमधून बाहेर येईल अशी त्यांची अपेक्षा होती. तेव्हा खुल्या रस्त्यावर लढाई झाली असती, स्टॉलप्रमाणे दाटी झाली नसती व कावळ्यावर चारही बाजूंनी हल्ला करणे शक्य झाले असते. पण कावळा धूर्त होता. चिमण्यांचा कावा त्याने ओळखला व तो स्टॉलमध्येच बसून राहिला.

शेवटी चिमण्यांनी धैर्य एकवटले आणि स्टॉलवर एकामागून एक झेपावायला त्यांनी सुरुवात केली.

तेथे अशी काही धुमाळी माजली की, स्टॉलभोवती लोकांची गर्दी जमा झाली.

पोलीस धावत आला. त्याने स्टॉलमध्ये डोकावून पाहिले व तो एकदम मागे सरला. सबंध स्टॉलभर चिमण्यांची पिसे उडत होती व त्यांच्यामधून काहीही पाहणे अशक्य होते.

"वा! ही खरी हातघाईची लढाई चाललीय!" पोलीस म्हणाला.

मारामारी थांबवावी म्हणून पोलीसाने स्टॉलच्या दारावर खिळ्यांनी ठोकलेल्या फळ्या उचकटायला आरंभ केला.

ह्याच वेळी थिएटरमध्ये वाद्यवृंदामधील व्हायोलिनवादकांनी आणि सेलोवादकांनी आपापल्या धनुकल्या उंचावल्या होत्या.

एका उंच माणसाने आपला फिकट हात उंचावला व सावकाशपणे त्या हाताची

हालचाल केली. भारी मखमाली पडद्यावर लाटा उमटल्या आणि हलकेच तो बाजूला झाला.

एक मोठ्ठी सूर्यप्रकाशित सुंदर सजवलेली खोली मारीयाच्या दृष्टीस पडली. तेथे भारी कपड्यांनी नटलेल्या दोन कुरूप बहिणी, दुष्ट सावत्र आई आणि सडपातळ बांध्याची, सुंदर दिसणारी व जुन्या भुरकट पोषाखामधील मारीयाची आई – अशा सगळ्याजणी उभ्या होत्या.

"हेमाराणी!" मारीया अस्फुटपणे उद्गारली. तिचे डोळे रंगमंचावर खिळून राहिले.

नंतर निळ्या, गुलाबी, सोनेरी प्रकाशांच्या उधळणीमधून चांदण्यात न्हाणारा राजवाडा तेथे अवतरला. आणि त्या राजवाड्यातून धावत जाताना मारीयाच्या आईने जिन्यावर बिलोरी काचेचा सँडल हरवला.

आईच्या दुःखानुसार आणि आनंदानुसार संगीताचे दुःखी आणि आनंदी सूर उमटत होते, म्हणून मनाला खूप बरे वाटत होते. जणू सर्व वाद्ये सजीव, भल्या मनाची माणसे होती. उंच वाद्यवृंदसंचालकासह ती सगळी वाद्ये आईला मदत करत होती. हेमाराणीला मदत करण्यात तो उंच माणूस एवढा गुंतला होता की, त्याने एकदाही मागे वळून प्रेक्षागृहाकडे पाहिले नाही. हे फार वाईट होते, कारण प्रेक्षागृहात चमकत्या डोळ्यांची आणि लाल लाल गालांची खूप मुले बसलेली होती.

कधीही खेळ न पाहणारे आणि कॉरीडॉरमध्ये कार्यक्रमपत्रिकांचे छोटे गठ्ठे व दुर्बिणी घेऊन उभे राहणारे म्हातारे द्वारपालसुद्धा आता हळूच चवड्यांवर चालत आत आले होते, आपल्यापाठी त्यांनी दारे हलकेच बंद करून घेतली होती व मारीयाच्या आईला ते पहात होते. त्यांच्यातल्या एकाने स्वतःचे डोळे टिपले. त्यात आश्चर्य नव्हते, कारण मारीयाची आई त्याच्या दिवंगत मित्राची मुलगी होती व तो मित्रही त्याच्यासारखाच एक द्वारपाल होता. मारीयाची आई फार छान नाचत होती.

शेवटी, बॅलेचा अखेरचा प्रसंग सुरू झाला होता. संगीताचे उंच आनंदी सूर उमटत होते. सर्वांच्या चेहऱ्यांवर स्मित उमटले होते. अशा आनंदाच्या क्षणी हेमाराणी-

च्या डोळयांमध्ये मात्र आसवे का, असा प्रश्न अनेकांच्या मनात उमटत होता. एवढ्यात जिन्यांवरून आणि कॉरीडॉरमधून वेगाने आत घुसून एक छोटा विस्कटलेल्या पिसांचा चिमणा रंगमंचाकडे उडत गेला. त्या चिमण्याने जोरदार मारामारी केली असावी असे त्याच्या अवतारावरून स्पष्ट दिसत होते.

चिमण्याने रंगमंचाभोवती एक प्रदक्षिणा घातली. त्याच्या चोचीमध्ये बिलोरी काचेच्या डहाळीसारखी काहीतरी वस्तू चमकत होती.

प्रेक्षागृहातून कुजबुजीची लाट गेली. वृंदसंचालकाने हात वर उचलला. वाद्यवृंदाने वाजवणे थांबवले. मागील रांगांमधील प्रेक्षक कुतूहलाने उठून पाहू लागले. चिमणा हेमाराणीपर्यंत उडत गेला. तिने हात पुढे केले व चिमण्याने तिच्या हातांच्या ओंजळीत छोटा काचेचा फुलगुच्छ टाकला. हेमाराणीने थरथरत्या बोटांनी स्वतःच्या पोषाखावर तो गुच्छ टोचून लावला.

वृंद-संचालकाने हातातील छडी फिरवली आणि वाद्यवृंदाने संगीताने थिएटर भरून टाकले. टाळयांच्या कडकडाटामुळे थिए-टरमधील दिवे थरथरले. चिमणा छताकडे उडाला, मोठ्या बिलो-री काचेच्या झुंबरावर बसला व स्वतःची पिसे नीट करू लागला.

हेमाराणी झुकून अभिवादन करत होती आणि तिचा चेहरा हसरा होता. मारीया-ला जर आधी माहीत नसते, तर ही हेमाराणी म्हणजेच तिची आई होती, हे तिने कधीच ओळखले नसते.

नंतर घरी जेव्हा सगळे दिवे विझवण्यात आले आणि रात्रीने खोलीत प्रवेश करून सर्वांना झोपण्याची आज्ञा केली, तेव्हा मारीयाने आईला विचारले:

"जेव्हा तू गुच्छ पोषाखाला टोचून लावलास, तेव्हा पपांची तुला आठवण झाली?"

"होय," आईने क्षणभर गप्प राहून उत्तर दिले.

"तू रडतेस का?"

"कारण मला आनंद होतोय की, तुझ्या पपांसारखी छान माणसं जगात आहेत."

"हे खरं नाही," मारीया पुटपुटली. "आनंद होतो तेव्हा हसतात."

“छोटा आनंद झाला, तर हसतात,” आई म्हणाली, “पण खूप मोठ्ठा आनंद झाला तर रडतात. आता तू झोप!”

मारीया झोपली. पेत्रोवना झोपली. आई खिडकीपाशी गेली. खिडकीजवळच्या झाडाच्या फांदीवर पाश्का झोपला होता. सर्वत्र शांतता होती. आकाशामधून सतत होणारा हिमवर्षाव त्या शांततेत भर घालत होता. आईच्या मनात आले की, त्या हिमाप्रमाणेच लोकांवर आनंदी स्वप्नांचा आणि परीकथांचा वर्षाव होतो.

